**गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली येथे नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी शिक्षकीय पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र.क्र.६१३/१६/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख :- ०९ जून, २०२०

वाचा :-

१. शासन अधिसूचना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२००९/(३२६/०९)/विशि-१, दि.०७ ऑक्टोबर, २००९.
२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.जीयुजी-२०१०/(६२२/१०)/विशि-१, दि.१० डिसेंबर, २०१०.
३. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१०/(४२५/१०)/विशि-१, दि.०५ मार्च, २०११.
४. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१२/(२८९/१२)/विशि-१, दि.११ नोव्हेंबर, २०१४.
५. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दि.०८ मार्च, २०१९.
६. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.६१३/१६/विशि-१, दि.१९ सप्टेंबर, २०१९

प्रस्तावना :-

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर विद्यापीठाने विभाजन होऊन गडचिरोली व चंद्रपूर जिल्हयाकरिता, महाराष्ट्र शासन अधिसूचना क्रमांक २००७/(३२२/०७)विशि-४, महाराष्ट्र अधिनियम १९९४ (१९९४ चा महा.३५) च्या कलम ३ च्या पोटकलम (२) अन्वये, दिनांक २७ सप्टेंबर, २०११ द्वारे गोंडवाना विद्यापीठाची स्थापना झालेली आहे. विद्यापीठ स्थापनेवेळी विद्यापीठात इंग्रजी,गणित, वाणिज्य, इतिहास व समाजशास्त्र असे एकूण पाच शैक्षणिक अभ्यासक्रम सुरू करून त्यासाठी आवश्यक असलेली शिक्षकीय पदे निर्माण करण्यात आलेली आहेत.

गोंडवाना विद्यापीठ हे नवनिर्मीत विद्यापीठ असल्यामुळे विद्यापीठ परिसरात रोजगार निर्माण करणारे तसेच महत्वाचे व आवश्यक मुलभूत पदव्युत्तर अभ्यासक्रम विद्यापीठ परिसरात असणे हे या भागाची अत्यंत निकड असल्यामुळे विद्यापीठामध्ये नवीन सात रोजगाराभिमुख शैक्षणिक अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी आवश्यक असलेली शिक्षक व शिक्षकेतर पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेने उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.११.०९.२०१९ रोजीच्या बैठकीत विचारार्थ ठेवण्यात आला. उच्च स्तरीय सचिव समितीने सदर बैठकीमध्ये गोंडवाना विद्यापीठामध्ये सात नवीन शैक्षणिक अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी ४९ शिक्षकीय व २८ शिक्षकेतर अशी एकूण ७७ पदे निर्माण करण्यास मान्यता दिली. उच्च

स्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार व शासन धोरणानुसार रू.७६००/- ग्रेड वेतन पेक्षा कमी ग्रेड वेतन (सहाव्या वेतन आयोगानुसार) असलेली २८ शिक्षकीय (सहायक प्राध्यापक) व २८ शिक्षकेतर अशी एकूण ५६ पदे निर्माण करण्याबाबत संदर्भाधीन क्र.६ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. उच्च स्तरीय सचिव समितीने दिलेल्या मंजूरीनुसार रू.७६००/- व त्यापेक्षा अधिक ग्रेड वेतन (सहाव्या वेतन आयोगानुसार) असलेली पदे (सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक) निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव मा. मंत्रिमंडळाच्या दि.०५ मार्च, २०२० रोजीच्या बैठकीत मंजूरीसाठी ठेवण्यात आला होता. तद्नुषंगाने मंत्रीमंडळाने दिलेल्या मंजूरीनुसार याबाबत सविस्तर शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. मंत्रीमंडळाने दि.०५ मार्च, २०२० रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली या विद्यापीठामध्ये खाली नमूद केलेले नवीन शैक्षणिक अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी आवश्यक असलेली शिक्षकीय पदे निर्माण करण्यास मान्यता देत आहे.

**अ) शिक्षकीय पदे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| **१. एम.एस्सी. संगणकशास्त्र** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| **२. एम. एस्सी .भौतिकशास्त्र** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| **३. एम. एस्सी .रसायन शास्त्र** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| **४. एम. ए .अप्लाईड अर्थशास्त्र** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| **५. एम. ए .मराठी** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| **६. एम. बी .ए.** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| **७. एम. ए .मास कम्युनिकेशन** | | | |
| १ | प्राध्यापक | रू.१,४४,२००-२,१८,२०० | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | रू.१,३१,४००-२,१७,१०० | २ |
| | | **एकूण** | **२१** |

२. उपरोक्त नमूद शिक्षकीय पदांसाठी येणाऱ्या सुमारे रू.४,२७,४२,५६०/- (अक्षरी रूपये चार कोटी सत्तावीस लक्ष बेचाळीस हजार पाचशे साठ रूपये) एवढ्या वार्षिक आवर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. डब्ल्यू-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण १०२- विद्यापीठांना सहाय्य (००) (०१) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने ३६ सहा. अनुदाने (वेतन) २२००२ ०६८३ या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. उक्त नमूद पदांच्या वेतनासाठी होणाऱ्या खर्चासाठी रक्कम विहित कार्यपध्दतीने अर्थसंकल्पित करून घेऊन खर्च करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५०/आपुक, दि.२७.०५.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने व मा. अपर मुख्य सचिव (सेवा) (साप्रवि) व सचिव (व्यय) (वित्त) यांच्या उपसमितीने दि.२१.०८.२०१९ रोजीच्या बैठकीत व उच्च स्तरीय सचिव समितीने दि.११.०९.२०१९ रोजीच्या बैठकीत तसेच मंत्रिमंडळाने दि.०५ मार्च, २०२० रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००६०९१५०२४४०९०८ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a174dd20b49[illegible]1571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c46cebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2020.06.09 15:31:06 +05'30'

**(विजय साबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. कुलगुरू, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र,
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर
८. कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली,
१०. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
११. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती (विशि-१)